पंचायत विस्तार (अनुसुचित क्षेत्र) अधिनियम, १९९६ (पेसा) अंतर्गत येत असलेल्या अनुसुचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना मत्स्यव्यवसाय विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचा लाभ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१४/प्र.क्र.३५/पदुम १३
५ वा मजला विस्तार, मंत्रालय,
मुंबई- ४०० ०३२
दि.१२ सप्टेंबर, २०१४

वाचा :-

१) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे जा.क्र. मत्स्यवि २००९/११४५/प्र.क्र.१६१/०९/पदुम १३, दि.२४/०८/२००९
२) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे जा.क्र. मत्स्यवि २०१०/प्र.क्र.२४७/पदुम १३, दि.२८/०९/२०१०
३) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे जा.क्र. मत्स्यवि २४१०/५२६/प्र.क्र.१०५/१०/पदुम १३, दि.७/१०/२०१०
४) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.अीया/सी/मत्स्य/नियम पुनर्रचना, दि.१/०९/१९८९

प्रस्तावना :-

पंचायत विस्तार (अनुसुचित क्षेत्र) अधिनियम, १९९६ अंतर्गत येत असलेल्या अनुसुचित क्षेत्रामधील तलावांचे हक्क ग्रामपंचायतींना / जिल्हा परिषदांना हस्तांतरीत करण्यात आलेले आहे. त्यानुसार शासनाच्या दि.२६/०६/२०१४ च्या सुधारीत तलाव ठेका धोरणामध्ये १०० हेक्टर खालील तलावाचे मासेमारी हक्क ग्रामपंचायत / पंचायत समित्यांना हस्तांतरीत केलेले आहे. आदिवासी विकास विभाग पुरस्कृत मत्स्यव्यवसाय विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या अवरुद्ध पाण्यातील मत्स्यसंवर्धन, मासेमारी साधने पुरवठा, मच्छिमार संस्थांचा विकास, मत्स्यबीज केंद्राची स्थापना, मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा व केज कल्चर इ. योजना राबविण्यात येते. या योजनांचा लाभ अनुसुचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींमार्फत राबवण्याची बाब मच्छिमारांना/ मच्छिमार संस्थांना देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे धोरण निश्चित करण्यात येत आहे

**शासन निर्णयः-**

१) सदर योजना पंचायत विस्तार (अनुसुचित क्षेत्र) अधिनियम, १९९६ अंतर्गत येत असलेल्या अनुसुचित क्षेत्रातील ग्रामपंचायतीमार्फत राबविण्यात याव्या. सदर योजनेचे लाभार्थी संबंधित ग्रामपंचायत राहील.

२) सदर योजना अनुसुचित क्षेत्रामधील ग्रामपंचायतीमार्फत राबवितांना त्यामधील इतर तरतुदी कायम राहतील.

३) सदर योजना राबविण्याचे अधिकार ग्रामपंचायतींना राहतील. अशा योजना राबवितांना ग्रामसभेचा ठराव घेणे बंधनकारक राहील.

४) सदर योजना राबविण्याबाबत ग्रामसभेमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार ठरावासह प्रस्तावास संबंधित ग्रामसचिव यांनी संबंधित, सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, यांची तांत्रिक मान्यता व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

५) योजना निहाय मान्यता प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचेमार्फत निधीची मागणी जिल्हा नियोजन समितीकडे करावी.

६) सदर योजनांसाठी निधी/ अनुदान सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत संबंधित ग्रामपंचायतींकडे हस्तांतरीत करावे.

७) योजना निहाय निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित ग्रामपंचायत यांनी सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांना सादर करावे. त्याची एक प्रत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेमार्फत शासनास सादर करणे बंधनकारक राहील. ग्रामपंचायत यांनी उपयोगीता प्रमाणपत्र ग्रामसभेची मान्यता घेऊन सादर करावे.

८) योजना निहाय प्राप्त मागील निधी उपयोगिता प्रमाणपत्र दिल्याशिवाय सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना पुढील निधी/ अनुदान वितरीत करता येणार नाही.

९) सदर योजना राबवितांना तांत्रिक अडचणी उद्‌भवल्यास संबंधितांनी जिल्हयाचे सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे तांत्रिक सहाय प्राप्त करुन घेता येईल.

१०) सदर योजनांच्या माध्यमातून होणाऱ्या आर्थिक फायद्याची विभागणी संबंधित ग्रामपंचायतीने ग्रामसभेमध्ये ठरवावी.

११) ग्रामपंचायतीने आर्थिक फायद्याचा वापर ग्रामपंचायतीच्या क्षेत्रातील तलावाच्या विकासासाठी तसेच ग्रामपंचायतीच्या विकासासाठी करावा.

१२) सदर योजनेची अंमलबजावणी करातांना केंद्र शासनाच्या मूळ तत्वाचे उल्लंघन होणार नाही, याची दक्षता संबंधित प्राधिकारी यांनी घ्यावी.

१३) सदर योजनांपैकी काही योजना राबविण्यापूर्वी आयुक्त, मत्स्यव्यवसाय / शासनाच्या सहमतीची आवश्यकता असल्यास त्याप्रमाणे संबंधित ग्रामपंचायतीने मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मार्फत सहमती घ्यावी.

१४) सदर योजनांचे पुरस्कर्ता प्राधिकारी आदिवासी विकास विभाग राहील, नियंत्रण प्राधिकारी मत्स्यव्यवसाय विभाग राहील व अंमलबजावणी प्राधिकारी ग्रामविकास विभाग राहील.

सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, ग्रामविकास विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१६१६३१०४६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.09.16 16:26:42 +05'30'

**( श.मा. साठे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांच खाजगी सचिव
५. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य
६. अप्पर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई-३२
७. प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-३२
८. प्रधान सचिव (वने), मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव (ग्रामविकास), मंत्रालय, मुंबई-३२
१०.प्रधान सचिव (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई-३२

११.प्रधान सचिव (सामाजिक न्याय), मंत्रालय, मुंबई-३२

१२.सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई-३२

१३.सचिव (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई-३२

१४.सचिव (लाक्षेवि), मंत्रालय, मुंबई-३२

१५.आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१६.आयुक्त सहकार, पुणे

१७.सर्व विभागीय आयुक्त

१८. सर्व जिल्हाधिकारी

१९.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

२०.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई

२१.सर्व आयुक्त, महानगरपालिका

२२.सर्व गटविकास अधिकारी

२३.सर्व सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय

२४.सर्व उपायुक्त, मत्स्यव्यवसाय

२५.महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर

२६.वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई-३२

२७.कृषि व पदुम विभागातील सर्व कार्यासने

२८. निवडनस्ती